**छोटया संवर्गातील मागासवर्गीयांकरिता आरक्षित पदे भरण्याबाबतची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः बीसीसी -२०१६/ प्र. क्र. २२८A/१६/१६-ब**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: २९ मे, २०१७

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०७०/इसीआर-जे,दि. २८.०५.१९७१,
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०७९/१५५/XVI-B,दि. १९.१२.१९७९,
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०९४/प्र.क्र.५७/९४/१६-ब,दि. ०५.१२.१९९४,
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०९७/प्र.क्र.२/९७/१६-ब,दि. २९.०३.१९९७,
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०९७/प्र.क्र.६३/९७/१६-ब,दि. १८.१०.१९९७,
६) महाराष्ट्र आरक्षण अधिनियम क्रमांक ८/२००४,
७) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब,दि. २६.१०.२००४,
८) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००८/प्र.क्र.४०७/०८/१६-ब,दि. २७.१०.२००८
९) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी २००९/प्र.क्र.२९१/०९/१६-ब,दि. ०५.११.२००९
१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी -२०११/ प्र. क्र. १०५६/११/१६-ब,दि. ५.०१.२०१२
११) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी -२०११/ प्र.क्र.१०५६/११/१६-ब,दि. १७.१०. २०१३

**प्रस्तावना:-**

छोटया संवर्गामध्ये मागासप्रवर्गाची आरक्षणाची पदे भरण्याबाबतची कार्यपध्दती कशी असावी याबाबत संदर्भाधीन क्रमांक -८ येथे नमुद केलेल्या दि.२७.१०.२००८ च्या परिपत्रकानुसार सुचना निर्गमित करण्यात आलेल्या होत्या . या शासन परिपत्रकास आव्हान देणारी याचिका क्र. ३०७७/२०११ मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यात आली होती. सदर याचिकेवर मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने दि. २९.०९.२०११ रोजी दिलेल्या आदेशान्वये, दि. २७.१०.२००८ रोजीच्या शासन परिपत्रकास, अंतरिम स्थगिती देण्यात आलेली होती. त्यास अनुसरून संदर्भ क्रमांक -१० येथे नमुद केलेल्या शासन निर्णय दि. ५.१.२०१२ अन्वये दि. २७.१०.२००८ च्या शासन परिपत्रकाची अंमलबजावणी पुढील आदेश होई पर्यंत स्थगित करण्यात आलेली होती. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि. ९.०५.२०१३ रोजी दिलेल्या अंतिम निर्णयानुसार, संदर्भ क्र. -११ येथे नमूद केलेल्या शासन निर्णय दि. १७ .१०. २०१३ अन्वये दि. २७ .१०.२००८ चे शासन परिपत्रक रद्द केले आहे. या न्यायालयीन निर्णयास छोटया संवर्गात पदे भरण्यासाठी अशा प्रकारे कार्यपध्दती अनुसरावी याबाबत शासन स्तरावर विविध शासकीय कार्यालयाकडून तसेच सहायक आयुक्त, मावक यांच्याकडून विचारणा होत होती. त्यास अनुसरुन प्रशासकीय कामकाजात सूसूत्रता राखण्याच्या दृष्टीने, मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार आरक्षण अधिनियम २००१ मधील तरतुदीशी सुसंगत अशी कार्यपध्दती ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

मागासवर्गीयांकरिता छोटया संवर्गातील आरक्षित पदे भरण्याबाबतची कार्यपध्दती बाबतचे शासन परिपत्रक दि. ०५.११.२००९ सोबत जोडलेल्या छोटया संवर्गातील पदे भरण्यासंदर्भातील प्रपत्र "ब" व "क" रद्द करुन या शासन परिपत्रकान्वये खालील प्रमाणे सुधारित कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे.

**छोट्या संवर्गाच्या बाबतीत पदोन्नतीने पदे भरताना अनुसरावयाची कार्यपध्दती :-**

आरक्षण अधिनियमातील कलम ४(२) मधील तरतुदीनुसार अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती,निरधीसूचित जमाती (विमुक्त जाती) ,भटक्या जमाती,विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागास प्रवर्ग यासाठी राखून ठेवलेल्या जागा अशा जातीतील,जमातीतील,प्रवर्गातील किंवा वर्गातील नसलेल्या उमेदवारांद्वारे भरण्यात येणार नाहीत. तथापि, छोटया संवर्गाच्याबाबतीत ज्यावेळी मंजूर पदसंख्या २,३ किंवा ४ असते, त्यावेळी सर्व मागास प्रवर्गासाठी केवळ एकच पद उपलब्ध होते. अशा परिस्थितीत :-

a. बिंदूनामावलींच्या क्रमवारीनुसार प्रथमत: अजा प्रवर्गाकरिता पद भरण्याचा विचार करावा. जर अजा प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध होत नसेल तर सदर पद ३ वर्षे रिक्त ठेवण्यात यावे. ४ थ्या वर्षी बिंदूनामावलीच्या क्रमवारीनुसार अ.ज. प्रवर्गाचा पात्र उमेदवार उपलब्ध झाल्यास, त्या प्रवर्गातील पात्र उमेदवारास पदोन्नती देण्यात यावी.

b. भविष्यात ज्यावेळी अनुसूचित जमातीचे पद रिक्त होईल, त्यावेळी जर अनुसूचित जातीचा पात्र उमेदवार पदोन्नतीसाठी उपलब्ध असेल, तर त्यास प्राथम्याने पदोन्नती देण्यात यावी. अशा वेळी सदर पद ३ वर्षे रिक्त ठेवण्याची आवश्यकता नाही.

c. जर अनुसूचित जमातीचा उमेदवार उपलब्ध होणार नसेल तर, सदर पद ३ भरती वर्षे रिक्त ठेवण्यात यावे. तद्नंतर बिंदुनामावलीच्या क्रमावारीनुसार वि.जा.भ.ज. या गटातील प्रथमत: वि.जा.(अ) प्रवर्गाच्या उमेदवाराचा पदोन्नतीसाठी विचार करण्यात यावा. वि.जा.अ. प्रवर्गाचा पात्र उमेदवार उपलब्ध असल्यास त्यास पदोन्नती देण्यात यावी.

d. मुख्य अधिनियमातील कलम ४(३) मधील तरतुदीनुसार वि.जा.(अ) , भ.ज.(ब) , भ.ज.(क) व भ.ज.(ड) या प्रवर्गाकरीता विहित करण्यात आलेले आरक्षण अंतर्गत परिवर्तनिय आहे, त्यामुळे जर वि.जा.(अ) प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध झाला नाही तर वि.जा.भ.ज. या गटातील ज्येष्ठता व पात्रतेच्या अधीन राहून पदोन्नतीसाठी असलेल्या बिंदुनामावलीच्या क्रमवारीनुसार भ.ज.(क), भ.ज.(ब),भ.ज.(ड) या प्रवर्गातील उपलब्ध पात्र कर्मचा-यास/अधिका-यास पदोन्नती देण्याची कार्यवाही करावी.

e. वरीलप्रमाणे वि.जा.भ.ज.प्रवर्गातील सर्व प्रवर्गांना प्रतिनिधित्व प्राप्त झाल्यानंतर वि.मा.प्र. प्रवर्गाचा पदोन्नतीसाठी विचार करावा.

f. वि.मा.प्र. प्रवर्गातील उमेदवार पदोन्नतीसाठी उपलब्ध न झाल्यास सदर पद ३ वर्ष पद रिक्त ठेवावे. चौथ्या वर्षी वि.मा.प्र.चा उमेदवार उपलब्ध न झाल्यास वरील प्रमाणे कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

g. वर नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार, छोटया संवर्गात पदोन्नतीच्या पदसंख्या १ ते ३२ पर्यंत असेल त्यावेळी सोबत जोडलेल्या **अनुसूची-अ** मध्ये नमूद केल्यानुसार बिंदुनामावलीच्या क्रमवारीनुसार ज्येष्ठता व पात्रतेच्या अधीन राहून पात्र कर्मचा-यास/अधिका-यास पदोन्नती देण्याची कार्यवाही करणे अपेक्षित आहे.

h. ज्यावेळी विभागास सदर पद ३ वर्ष रिक्त ठेवणे प्रशासकिय कामकाज सुरळीत चालण्याच्या दृष्टीने शक्य नसेल, अशा वेळी मागास प्रवर्गासाठी आरक्षित असलेले पद ३ वर्ष तात्पुरत्या स्वरुपात अनारक्षित करुन, ते पद तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठ उमेदवारांमधून पदोन्नतीने भरण्यात यावे. सदर पदोन्नती ही केवळ ११

महिन्याकरिता किंवा ज्या मागास प्रवर्गासाठी पद आरक्षित आहे, त्या प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध होईपर्यंत, या पैकी जे अगोदर घडेल तो पर्यंत किंवा जास्तीत जास्त ३ वर्षाच्या कालावधी पर्यंत (मुळ मागास प्रवर्गाचे पद रिक्त झाल्याच्या दिनांकापासून पुढील ३ वर्षाच्या कालावधी पर्यंत) तात्पुरत्या स्वरुपात असेल.

i. ३ वर्षानंतर बिंदूनामावलीच्या क्रमवारीनुसार पुढील मागास प्रवर्गाचा पात्र उमेदवार पदोन्नतीसाठी उपलब्ध असेल तर त्यास नियमित पदोन्नती देण्यात यावी. जर असा पात्र उमेदवार उपलब्ध नसेल तर वरीलप्रमाणे सेवाजेष्ठ उमेदवाराची तात्पुरती पदोन्नती पुढे सुरु ठेवावी.

**छोट्या संवर्गात सरळसेवा भरती करतांना अनुसरावयाची कार्यपध्दती :-**

a. सरळसेवेच्या छोटया संवर्गाच्याबाबतीत बिंदूनामावलींच्या क्रमवारीनुसार प्रथमत: अजा प्रवर्गाकरिता पद भरण्याचा विचार करावा. जर सरळसेवा भरतीनुसार अजा प्रवर्गाचे पद उपलब्ध झाल्यास त्या प्रवर्गातील उमेदवारास नियुक्ती देण्यात यावी. ज्यावेळी अनुसूचित जातीचा पात्र उमेदवार उपलब्ध होणार नाही, त्यावेळी सदर पद मुख्य अधिनियमातील कलम ६ (१)च्या तरतुदीनुसार अनुशेष म्हणून पाच वर्षापर्यंत पुढे ओढण्यात यावे.

b. पहिले पाच वर्ष मूळ प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध होईपर्यंत पद रिक्त ठेवण्यात यावे. विभागाने / नियुक्ती प्राधीकरणाने पहिले ५ वर्ष पद भरतीसाठी प्रयत्न करावा. सदर प्रयत्न करुनही मूळ प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध न झाल्यास ६ व्या वर्षी बिंदुनामावलीच्या क्रमवारीनुसार अनुसूची ब मध्ये नमूद केल्यानुसार पुढील बिंदुमधून म्हणजेच अनुसूचित जमातीमधील उमेदवारामधुन पद भरण्यात यावे.

c. उदा. ज्यावेळी मंजूर पद संख्या ४, ५ असेल तेव्हा २ पदे आरक्षणासाठी उपलब्ध होतात. अशावेळी एक पद अ.जा. प्रवर्गासाठी कायमस्वरुपी उपलब्ध होते. दुसरे पद अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी उपलब्ध होते.(अपुर्णांकात) अनुसूचित जमाती प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध झाल्यास प्रथमत: अनुसूचित जमाती प्रवर्गामधून सदर पद भरावे. अनुसूचित जमाती प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध न झाल्यास, पद भरण्यासाठी पाच भरतीवर्ष प्रयत्न करावा. जर अनुसूचित जमातीचा उमेदवार उपलब्ध झाला नाही, तर वरीलप्रमाणे सदर पद ५ वर्षे रिक्त ठेवावे. तद्नंतर सहाव्या वर्षी बिंदुनामावलीच्या क्रमावारीनुसार वि.जा.भ.ज. या गटातील प्रथमत: वि.जा.(अ) प्रवर्गाच्या पात्र उमेदवाराचा नियुक्तीसाठी विचार करण्यात यावा. वि.जा.अ. प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध असल्यास, त्यास नियुक्ती देण्यात यावी. मुख्य अधिनियमातील कलम ४(३) मधील तरतुदीनुसार वि.जा.(अ) , भ.ज.(ब) , भ.ज.(क) व भ.ज.(ड) या प्रवर्गाकरीता विहित करण्यात आलेले आरक्षण अंतर्गत परिवर्तनिय आहे, त्यामुळे जर वि.जा.(अ) प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध झाला नाही तर वि.जा.भ.ज. या गटातील गुणवत्ता व पात्रतेच्या अधीन राहून बिंदुनामावलीच्या क्रमानुसार पुढील प्रमाणे भ.ज.(ब), भ.ज.(क),भ.ज.(ड) या प्रवर्गातील उपलब्ध पात्र उमेदवारास नियुक्ती देण्याची कार्यवाही करावी. पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास, बिंदुनामावलीच्या क्रमवारीनुसार पुढच्या बिंदुस प्राधान्य द्यावे. अशा प्रकारे ज्या मागास प्रवर्गास प्रतिनिधीत्व प्राप्त होईल , ते पद रिक्त झाल्यानंतर पुढील वर्षी जाहिरात देताना त्या मागास प्रवर्गास ,वगळून उर्वरीत मागास प्रवर्गाची जाहिरात देण्यात यावी.

d. **सरळसेवेच्या बाबतीत** वर नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार सोबत जोडलेल्या **अनुसूची-ब** मध्ये नमूद केलेल्या बिंदूनामावलीच्या क्रमवारीनुसार पद भरण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

e. ज्यावेळी विभागास सदर पद ५ वर्ष रिक्त ठेवणे प्रशासकिय कामकाज सुरळीत चालण्याच्या दृष्टीने शक्य नसेल, अशा वेळी मागास प्रवर्गासाठी आरक्षित असलेले पद ५ वर्ष तात्पुरत्या स्वरुपात अनारक्षित करुन, तदर्थ पदोन्नतीने जेष्ठतेनुसार भरता येईल. सदर पदोन्नती ही केवळ ११ महिन्याकरिता किंवा पद ज्या मागास प्रवर्गासाठी आरक्षित आहे त्या प्रवर्गाचा उमेदवार उपलब्ध होईपर्यंत या पैकी जे अगोदर घडेल

तो पर्यंत किंवा जास्तीत जास्त ५ वर्षाच्या कालावधी पर्यंत (मुळ मागास प्रवर्गाचे पद रिक्त झाल्याच्या दिनांकापासून पुढील ५ वर्षाच्या कालावधी पर्यंत) तात्पुरत्या स्वरुपात करण्यात यावी.

f. ज्यावेळी कोणताही मागास प्रवर्गातील उमेदवार उपलब्ध होत नसेल, अशावेळी सदर पद तात्पुरते अनारक्षित करण्याबाबतची कार्यवाही शासन निर्णय दि.५.१२.१९९४ मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दती नुसार करावी.

२. वरील प्रमाणे केलेल्या कार्यवाहीबाबत, संबंधित नियुक्ती प्राधिका-यांनी बिंदूनामावलीमध्ये शेरा या स्तंभामध्ये अद्ययावत नोंद घेणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभाग प्रमुखांच्या/ नियुक्ती प्राधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावा.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१७०५२९१६३७४०१७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bajirao Ramchandra Jadhav

Digitally signed by Bajirao Ramchandra Jadhav
DN: c=IN, o=All India Services, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=da7af9a688a9961efe4eae0cdd0d1faf68b32eafe7e333344d14d91248f753bf, cn=Bajirao Ramchandra Jadhav
Date: 2017.05.31 16:40:06 +05'30'

**( बाजीराव जाधव )**
**सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२.मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३.मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-३२.
४.मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई-३२.
५.सर्व मा. विधानसभा सदस्य/मा.विधानपरिषद सदस्य/मा.संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६.मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३५.
७.मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
८.सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
९.मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.
१०.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
११.प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानसभा), मुंबई.
१२. सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय(विधानपरिषद), मुंबई.
१३.सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
१४. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१५. सर्व सहायक आयुक्त (मागासवर्ग कक्ष), महाराष्ट्र राज्य.
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई.

१७. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
१८. प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१९. प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,नागपूर,औरंगाबाद.
२०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२१.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२२.सचिव,राज्य निवडणूक आयोग,मंत्रालय, मुंबई-३२.
२३.सचिव,राज्य माहिती आयोग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
२५.राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक.
२६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२७.सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.
२८.संचालक, समाजकल्याण, पुणे.
२९.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
३०.संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३१.संचालक, सेवायोजन, मुंबई.
३२.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
३३.महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
३४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३६.सर्व मंत्रालयीन विभाग, त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिपत्त्याखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांना सदर शासन निर्णयाची प्रत, त्यांच्या स्तरावरुन स्वतंत्रपणे पाठवून कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात याव्यात.
३७.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई. (५ प्रती)
३८.सर्व मान्यता प्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये,महाराष्ट्र राज्य.
३९.निवड नस्ती, कार्यासन १६-ब.

| | | **अनुसूची-अ**<br>**पदोन्नतीकरिता छोटया संवर्गासाठी आरक्षित पदांचा तपशील-** |
|---|---|---|
| पद संख्या | आरक्षणाची पदे | प्रवर्ग निहाय आरक्षण |
| १ | ० | आरक्षण अधिनियम २००१ मधील कलम ३ (१) (घ) तरतुदीनुसार एकाकी पदास आरक्षण लागू नाही. |
| २ | १ | अ.जा., अ.ज., वि.जा.(अ),भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ३ | १ | अ.जा., अ.ज., वि.जा.(अ),भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ४ | १ | अ.जा., अ.ज., वि.जा.(अ), भ.ज.(क),भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ५ | २ | अ.जा. प्रवर्गास एक पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. व आरक्षणाचे दुसरे पद अ.ज-१.तद्नंतर, वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब),भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| ६ | २ | अ.जा. प्रवर्गास एक पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाचे दुसरे पद अ.ज-१.तद्नंतर., वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| ७ | २ | अ.जा. प्रवर्गास एक पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाचे दुसरे पद अ.ज-१.तद्नंतर वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| ८ | ३ | अ.जा.-१ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. तद्नंतर आरक्षणाचे तिसरे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| ९ | ३ | अ.जा.-१ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. तद्नंतर आरक्षणाचे तिसरे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| १० | ३ | अ.जा.-१ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. तद्नंतर आरक्षणाचे तिसरे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| ११ | ४ | अ.जा.-२ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाचे चौथे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| १२ | ४ | अ.जा.-२ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाचे चौथे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| १३ | ४ | अ.जा.-२ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाचे चौथे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| १४ | ४ | अ.जा.-२ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाचे चौथे पद वि.जा.(अ), भ.ज.(क), भ.ज.(ब), भ.ज.(ड),वि.मा.प्र. या क्रमाने उपलब्ध होईल. |
| १५ | ५ | अ.जा.-२ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |

| | | |
|---|---|---|
| १६ | ५ | अ.जा.-२ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| १७ | ६ | अ.जा.-३ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| १८ | ६ | अ.जा.-३ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| १९ | ६ | अ.जा.-३ व अ.ज.-१ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| २० | ७ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| २१ | ७ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| २२ | ७ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल. आरक्षणाची उर्वरित दोन पदे वि.जा.(अ), -१ भ.ज.(क)-१ या दोन प्रवर्गास उपलब्ध होतील. तद्नंतर आळीपाळीने विमाप्र प्रवर्गास उपलब्ध होईल. |
| २३ | ८ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर बिंदुनामावलीच्या क्रमावारीनुसार भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २४ | ८ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर बिंदुनामावलीच्या क्रमावारीनुसार भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २५ | ८ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर बिंदुनामावलीच्या क्रमावारीनुसार भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २६ | ९ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर आरक्षणाचे उर्वरित पद भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने उपलब्ध होईल |
| २७ | ९ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर आरक्षणाचे उर्वरित पद भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने उपलब्ध होईल. |

| | | |
|---|---|---|
| २८ | ९ | अ.जा.-३ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर आरक्षणाचे उर्वरित पद भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने उपलब्ध होईल. |
| २९ | १० | अ.जा.-४ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर आरक्षणाचे उर्वरित पद भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने उपलब्ध होईल. |
| ३० | १० | अ.जा.-४ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर आरक्षणाचे उर्वरित पद भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने उपलब्ध होईल. |
| ३१ | १० | अ.जा.-४ व अ.ज.-२ पद कायमस्वरुपी उपलब्ध होईल.वि.जा.(अ) १ पद, भ.ज.(क)-१ भ.ज.(ब)-१ तद्नंतर आरक्षणाचे उर्वरित पद भ.ज.(ड) व वि.मा.प्र. या प्रवर्गास आळीपाळीने उपलब्ध होईल. |
| ३२ | ११ | मंजूर पद संख्या ३२ अथवा त्यापैक्षा जास्त असेल तर प्रत्येक प्रवर्गास किमान १ पद उपलब्ध होते. |

| | | **अनुसूची-ब**<br>**सरळसेवेकरिता छोटया संवर्गासाठी आरक्षित पदांचा तपशील-** |
|---|---|---|
| मंजूर पदसंख्या | आरक्षणाची पदे | प्रवर्ग निहाय आरक्षण |
| १ | ० | आरक्षण अधिनियम २००१ मधील कलम ३ (१) (घ) येथील तरतुदीनुसार एकाकी पदास आरक्षण लागू नाही. |
| २ | १ | प्रथम अ.जा.-१ तद्नंतर अ.ज., वि.जा. भ.ज. {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) },इ.मा.व.,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ३ | १ | प्रथम अ.जा.-१ तद्नंतर अ.ज., वि.जा. भ.ज. {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) },इ.मा.व.,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ४ | २ | प्रथम अ.जा.-१ कायमस्वरुपी , अ.ज.-१,तद्नंतर , वि.जा. भ.ज.- {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) },इ.मा.व ,वि.मा.प्र.आळीपाळीने, या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ५ | २ | प्रथम अ.जा.-१ कायमस्वरुपी ,अ.ज.-१,तद्नंतर , वि.जा. भ.ज.- {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) },इ.मा.व ,वि.मा.प्र.आळीपाळीने, या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ६ | ३ | अ.जा.-१ , अ.ज.-१ कायमस्वरुपी, वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) },तद्नंतर ,इ.मा.व ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ७ | ३ | अ.जा.-१ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) },तद्नंतर ,इ.मा.व ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ८ | ४ | अ.जा.-१ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) }इ.मा.व-१ ,तद्नंतर ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| ९ | ४ | अ.जा.-१ व अ.ज.-१ कायमस्वरुपी,वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) }इ.मा.व-१ ,तद्नंतर ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे एक पद उपलब्ध होईल. |
| १० | ५ | अ.जा.-१ व अ.ज.-१ कायमस्वरुपी,वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) }इ.मा.व-२,तद्नंतर ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| ११ | ५ | अ.जा.-१ व अ.ज.-१ कायमस्वरुपी,वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) }इ.मा.व-२,तद्नंतर ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १२ | ६ | अ.जा.-२ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) }इ.मा.व-२,तद्नंतर ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १३ | ६ | अ.जा.-२ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, वि.जा. भ.ज.-१ {(वि.जा.)(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) }इ.मा.व-२,तद्नंतर ,वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १४ | ७ | अ.जा.-२ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, , (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-२,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |

| | | |
|---|---|---|
| १५ | ७ | अ.जा.-२ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, , (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-२,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १६ | ८ | अ.जा.-२ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, , (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-३,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १७ | ८ | अ.जा.-२ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, , (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-३,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १८ | ९ | अ.जा.-३ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, , (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-३,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| १९ | ९ | अ.जा.-३ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, , (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-३,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २० | १० | अ.जा.-३ व अ.ज.-१ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-४,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २१ | ११ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-४,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २२ | ११ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-४,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २३ | ११ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,इ.मा.व-४,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २४ | १२ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-४,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २५ | १२ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-४,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने आळीपाळीने आरक्षणाचे पद उपलब्ध होईल. |
| २६ | १३ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-५,तद्नंतर वि.मा.प्र.,, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| २७ | १३ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-५,तद्नंतर वि.मा.प्र., या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| २८ | १४ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-५,वि.मा.प्र.-१, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| २९ | १४ | अ.जा.-३ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-५,वि.मा.प्र.-१, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| ३० | १५ | अ.जा.-४ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-५, वि.मा.प्र.-१, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| ३१ | १५ | अ.जा.-४ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-५,वि.मा.प्र.-१, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| ३२ | १६ | अ.जा.-४ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,इ.मा.व-६,वि.मा.प्र.-१, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |
| ३३ | १७ | अ.जा.-४ व अ.ज.-२ कायमस्वरुपी, (वि.जा.-अ)-१, भ.ज.(ब)-१,भ.ज.(क)-१,भ.ज.(ड)-१ इ.मा.व-६,वि.मा.प्र.-१, या क्रमाने पद उपलब्ध होईल. |